**दिनांक २४ सप्टेंबर, २०२१ ते २९ सप्टेंबर, २०२१ या कालावधीत दिल्ली येथे आयोजित अखिल भारतीय नागरी लॉन टेनिस स्पर्धा २०२०-२१ मध्ये महाराष्ट्राचा संघ सहभागी होण्यासाठी होणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अभानासे- ३८२१/प्र.क्र.९९/क्रीयुसे-२,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २२ सप्टेंबर, २०२१.

<u>वाचा</u>:- १. केंद्रीय नागरी सेवा, सांस्कृतिक कार्य आणि क्रीडा मंडळ यांचे पत्र क्रमांक- ५९/२/२०१९-२०/CCSCSB, दि.२५.०८.२०२१.
२.महासचिव, सचिवालय जिमखान्या यांचे पत्र क्र.-अभानासे/लॉन टेनिस/२०२०-२१ दि.१४.९.२०२१.
३. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग,मुंबई यांचे पत्र क्रमांक- उपसंक्री/अभानासे/२१-२२/का-४/९३७, दि.१६.०९.२०२१.
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. अभानासे ३८२१/प्र.क्र. ९२/क्रीयुसे-२ दि. ०९.०९.२०२१

**<u>शासन निर्णय</u> :-**

दिनांक २४ ते २९ सप्टेंबर, २०२१ या कालावधीत त्यागराज स्टेडियम, आयएनए, दिल्ली येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०२०-२१ मध्ये भाग घेण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा संघ निवडण्याकरिता सचिवालय जिमखाना, मुंबई येथे दि.०९ सप्टेंबर, २०२१ रोजी निवड चाचणी आयोजित करण्यात आली होती. या चाचणीमध्ये सहभागी झालेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांची यादी सोबतच्या विवरणपत्र "क" प्रमाणे तसेच निवड चाचणीद्वारे निवडण्यात आलेल्या राज्याचा संघ विवरणपत्र "अ" प्रमाणे आहे. सदर स्पर्धेची निवड चाचणी, प्रशिक्षण शिबीर तसेच राज्याचा संघ सहभागी होण्यासाठी विवरणपत्र "ब" प्रमाणे होणाऱ्या रु. ९२,७९५/-(रुपये ब्यानव हजार सातशे पंच्यानव फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. या साठी उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. स्पर्धेत सहभागी होण्यासाठी संबंधित विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी, खेळाडू/ प्रशिक्षक/ व्यवस्थापक यांना दिनांक २० ते २२ सप्टेंबर, २०२१ या कालावधीत प्रशिक्षण शिबिरासाठी व दिनांक २४ ते २९ सप्टेंबर,२०२१ या कालावधीत स्पर्धेत सहभागी होण्यासाठी दिनांक २० सप्टेंबर, २०२१ (म.नं.) पासून कार्यमुक्त करावे व या खेळाडूंच्या सेवा सचिवालय जिमखान्यास उपलब्ध करून देण्यात याव्यात. संघातील प्रत्येक खेळाडूने व व्यवस्थापकाने ते ज्यांच्या अधिपत्याखाली काम करीत असतील त्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांची परवानगी घेणे आवश्यक आहे.

४. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे,१९८९ व क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२ मधील तरतूदींनुसार संघातील खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांची दि. २० सप्टेंबर ते ३० सप्टेंबर, २०२१ (प्रशिक्षण शिबीर, स्पर्धा व प्रवास) या काळातील कार्यालयीन अनुपस्थिती "कर्तव्य कालावधी" म्हणून समजण्यात यावी. तसेच त्यांच्या प्रवासभत्ता,

दैनिक भत्ता व इतर भत्ते यावर होणारा खर्च संबंधित विभागाच्या/कार्यालय प्रमुखांच्या मुख्य लेखाशिर्षाखाली असणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच, मुंबईबाहेरील खेळाडूंना अनुज्ञेय असलेला प्रवास/दैनिक भत्ता व इतर सवलती या वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक -एलव्हीई-१४०४/प्र.क्र.८/अ/सेवा-८, दिनांक २७ फेब्रुवारी, २००४ अन्वये मंजूर करण्यात यावी. या सवलतीचा लाभ मिळण्यासाठी निवड चाचणीसाठी उपस्थिती असणा-या अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत मानद सचिव, सचिवालय जिमखाना यांनी दिलेले प्रमाणपत्र संबंधित कर्मचा-यांनी त्यांच्या आस्थापना कार्यासनात सादर करणे आवश्यक राहिल.

५. स्पर्धेच्या निवड चाचणीसाठी उपस्थित अधिकारी/कर्मचारी (विवरणपत्र-क) यांची कार्यालयीन अनुपस्थिती शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२ अन्वये कर्तव्यार्थ म्हणून समजण्यात यावी.

६. सचिवालय जिमखान्याने प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र कोणत्याही परिस्थितीत आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना स्पर्धेत केलेल्या खर्चाच्या अहवालासोबत सादर करावे. तसेच शिल्लक राहील्यास, शिल्लक रक्कम उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना त्वरीत परत करण्यात यावी.

७. यासाठी होणारा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी “२२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०६) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा, (०६) (०२) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेत सहभाग (२२०४ १९८१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित तरतूदीतून यासाठी वितरीत केलेल्या रु.१६ लक्ष इतक्या निधिमधून भागविण्यात यावा .

८. सचिवालय जिमखाना यांच्याकडून स्पर्धेचा अहवाल, बाबनिहाय प्रत्यक्ष झालेल्या खर्चाचा तपशील, विनियोग प्रमाणपत्र, परीक्षीतलेखा विवरणपत्र व मंजूरी आदेशातील सर्व अटींची पूर्तता करण्याच्या अटीवर विवरणपत्र"ब" प्रमाणे खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२२१५२१४०९६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2021.09.22 15:29:22 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे विभाग, पुणे
३. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई,
४. जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०२१.

६. महालेखापाल (लेखावअनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
८. वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय,मुंबई.
९. मानद महासचिव,सचिवालय जिमखाना, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती)
१०. संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचे कार्यालये (सचिवालय जिमखान्यामार्फत)
११. निवड नस्ती (क्रीयुसे-२).

## विवरणपत्र “अ”

दिनांक २४ ते २९ सप्टेंबर २०२१ या कालावधीत त्यागराज स्टेडियम, आयएनए, दिल्ली येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०२०-२१ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघाचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या स्पर्धकांची नावे दर्शविणारे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूंचे नाव व पदनाम | ट्रॅक सूट | किटबॅग | विभाग / कार्यालय |
|---|---|---|---|---|
| | **पुरुष** | | | |
| १ | डॉ. दर्शन मु. दक्षिणदास | होय | होय | अधिष्ठाता, शासकीय दंत महाविद्यालय, नागपूर. |
| २ | श्री. प्रदिप द. जगदाळे, राज्यकर उपायुक्त | होय | होय | सह आयुक्त, राज्यकर -३, वस्तू व सेवा कर विभाग, पुणे |
| ३ | श्री. सुधीर ग. कुंभार, राज्यकर उपायुक्त | होय | होय | वस्तू व सेवाकर विभाग, गणपती नगर, जळगांव - |
| ४ | श्री. प्रकाश सूर्यवंशी, सहा. राज्यकर आयुक्त | होय | होय | अप्पर राज्यकर आयुक्त यांचे कार्यालय, GST भवन, येरवडा, पुणे. |
| ५ | श्री. जुगल गु. जाधव, शाखा अभियंता | होय | होय | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुसद. |
| ६ | श्री. राजाराम शि. देवकर, उपसंपादक | होय | होय | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. |
| ७ | श्री. अमोल शं. वाणी, कर सहाय्यक | होय | होय | राज्यकर सह आयुक्त, नो.ङि १ व २, आस्थापना अधिकारी, वस्तू व सेवाकर भवन, माझगांव, मुंबई. |
| ८ | श्रीमती निमा अरोरा, जिल्हाधिकारी | होय | होय | जिल्हाधिकारी कार्यालय, अकोला. |
| ९ | सौ. संध्याराणी ग. बंडगर<br>मुख्य लेखापाल | होय | होय | उपवनसंरक्षक, वन भवन, नेहरु नगर, सोलापूर |
| १० | श्री. प्रशांत मेंगळ<br>टेनिस बॉय (प्रशिक्षक) | होय | होय | राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालय, राजभवन, मलबारहिल, वाळकेश्वर, मुंबई. |
| ११ | श्री. अनिरुध्द देशपांडे<br>कक्ष अधिकारी<br>(व्यवस्थापक) | होय | होय | सांस्कृतिक व पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई. |

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2021.09.22 15:40:15 +05'30'

**( स्वा.म.नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

## विवरणपत्र "ब"

दिनांक २४ ते २९ सप्टेंबर २०२१ या कालावधीत त्यागराज स्टेडियम, आयएनए, दिल्ली येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०२०-२१ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघासाठी होणाऱ्या खर्चाचे विवरणपत्र.

| क्र. | तपशील | रक्कम |
|---|---|---|
| अ) | **निवड चाचणी** | |
| १ | निवड चाचणीपूर्वीचा खर्च. | ५०० |
| ब) | **निवड चाचणी आयोजनाचा खर्च.** | |
| १ | प्रमुख पंच व सहायक पंच यांचे मानधन व प्रवास खर्च. | २२५० |
| २ | निवड चाचणीस उपस्थित जिमखाना पदाधिकारी/ प्रतिनिधी यांच्याकरिता चहा/ अल्पोपहारावरील खर्च. | २५०० |
| ३ | निवड चाचणीसाठी १० कॅन लॉन टेनिस चेंडू. | २७५० |
| ४ | प्रथोमोपचार साहित्य. | ५०० |
| क) | **प्रशिक्षण शिबीर.** | |
| १ | अ. दिनांक २० ते २२ सप्टेंबर, २०२१ या कालावधीत प्रशिक्षकांचे + बॉल बॉयचे मानधन एकत्रित गाडी भाड्यासह.<br>ब. दिनांक २० ते २२ सप्टेंबर, २०२१ या कालावधीत खेळाडू व व्यवस्थापक यांना ३ दिवसांकरिता एकत्रित अल्पोपहार खर्च (प्रत्येक दिवसाचे रु.७५ X दिवस ३ X एकूण खेळाडू ९ +२ ) | ७४७५ |
| ३ | प्रशिक्षण शिबीराकरिता ३० कॅन लॉन टेनिस चेंडू. | ८२५० |
| ४ | औषधे व किरकोळ. | ५५० |
| ड) | **संघासाठी साहित्य** | |
| १ | ३ लॉन टेनिस रॅकेट रु. ५,०००/- प्रमाणे. | १५००० |
| इ) | **वैयक्तिक क्रीडा साहित्य होणारा खर्च :-** | |
| १ | ११ ट्रॅकसूट प्रत्येकी रु. ८००/- प्रमाणे | ८८०० |
| २ | ११ किटबॅग प्रत्येकी रु. ५००/- प्रमाणे. | ५५०० |
| ३ | २२ टि शर्टस् रु. ५००/- प्रमाणे. | ११००० |
| ४ | १८ शॉटर्स रु. ५००/- प्रमाणे. | ९००० |
| ५ | ४ स्कर्ट रु. ६५०/- प्रमाणे. | २६०० |
| ६ | ११ बूटांचे जोड प्रत्येकी रु. १३२०/- प्रमाणे. | १४५२० |
| ७ | ११ पायमोजे प्रत्येकी रु. १००/- प्रमाणे | ११०० |
| फ) | **प्रथमोपचाराकरिता खर्च.** | |
| | ग्लुकोज/ औषधे/स्प्रे इत्यादीसाठी खर्च. | ५०० |
| | **एकूण रुपये :- (रु. ब्यानव हजार सातशे पंच्यानव फक्त)** | **९२,७९५/-** |

Swati Madhukar Nanal
Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2021.09.22 15:40:33 +05'30'

( स्वा. म. नानल )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

<u>विवरणपत्र - क</u>

दिनांक २४ ते २९ सप्टेंबर २०२१ या कालावधीत त्यागराज स्टेडियम, आयएनए, दिल्ली येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा लॉन टेनिस स्पर्धा २०२०-२१ मध्ये भाग घेणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या लॉन टेनिस संघाची निवड करण्यासाठी दि. ९ सप्टेंबर, २०२१ रोजी निवड चाचणीसाठी उपस्थित राहिलेले अधिकारी कर्मचारी खेळाडूंची नावे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूंचे नाव व पदनाम | विभाग / कार्यालय |
|---|---|---|
| १ | श्री. प्रशांत मेंगळ, टेनिस बॉय | राज्यपालांचे परिवार प्रबंधक कार्यालय, राजभवन, मलबारहिल, वाळकेश्वर, मुंबई. |
| २ | श्री. राजाराम शि. देवकर, उपसंपादक | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. |
| ३ | श्री. सुधीर ग. कुंभार, राज्यकर उपायुक्त | वस्तू व सेवाकर विभाग, गणपती नगर, जळगांव - |
| ४ | श्री. जुगल गु. जाधव, शाखा अभियंता | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुसद. |
| ५ | श्री. प्रदिप द. जगदाळे, राज्यकर उपायुक्त | सह आयुक्त, राज्यकर -३, वस्तू व सेवा कर विभाग, पुणे |
| ६ | श्री. प्रकाश आर. सूर्यवंशी, सहा. राज्यकर आयुक्त | अप्पर राज्यकर आयुक्त यांचे कार्यालय, GST भवन, येरवडा, पुणे. |
| ७ | श्री. सौरभ कटीयार, भा.प्र.से. मुख्य कार्यकारी अधिकारी | मुख्य कार्यकारी अधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी कार्यालय, जिल्हा परिषद, अकोला. |
| ८ | श्री. अमोल शं. वाणी, कर सहाय्यक | राज्यकर सह आयुक्त, नो.ङि १ व २, आस्थापना अधिकारी, वस्तू व सेवाकर भवन, माझगांव, मुंबई. |
| ९ | डॉ. दर्शन मु. दक्षिणदास | अधिष्ठाता, शासकीय दंत महाविद्यालय, नागपूर. |
| १० | श्रीमती निमा अरोरा, जिल्हाधिकारी | जिल्हाधिकारी कार्यालय, अकोला. |
| ११ | सौ. संध्याराणी ग. बंडगर मुख्य लेखापाल | उपवनसंरक्षक, वन भवन, नेहरु नगर, सोलापूर |
| १२ | श्री. सतीश ना. सोनवाने, सहा. कक्ष अधिकारी | जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १३ | श्री. अनिरुध्द सू. देशपांडे, सहा. कक्ष अधिकारी | सांस्कृतिक व पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई. |

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2021.09.22 15:40:52 +05'30'

**( स्वा.म.नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**